**वित्तीय वर्ष २०२३-२४ मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरिता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाला उपकराची व शासन अंशदानाची रक्कम वितरित करण्याबाबत......**

**महाराष्ट्र शासन**

**गृहनिर्माण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२३/प्र.क्र.९८/दुवपु-२**

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,

दिनांक: २८ मार्च,२०२४

**संदर्भ-**१. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.

२. शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२३/प्र.क्र.९८/दुवपु-२, दि.०९.०१.२०२४.

**प्रस्तावना :**

मुंबई शहर बेटावरील जुन्या व मोडकळीस आलेल्या उपकरप्राप्त इमारतींची दुरुस्ती/ पुनर्बांधणी करण्याकरिता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास अधिनियम, १९७६ च्या कलम ८२ अन्वये मुंबई शहर व बेटावरील इमारतींवर दुरुस्ती उपकर आकारला जातो. तसेच कलम ८५ अन्वये तो बृहन्मुंबई महानगर पालिकेकडून वसूल करण्यात येतो व एकूण वजावटीच्या ५ टक्के रक्कम वगळून उर्वरित रक्कम राज्याच्या एकत्रित निधीत जमा करण्यात येते. दुरुस्ती उपकराची व अंशदानाची रक्कम विनियोजनान्वये, अर्थसंकल्पित करुन ती कलम ८६ (१) व कलम ९७ (१) नुसार मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत वर्ग करण्यासाठी राज्य शासनाकडून वितरीत करण्यात येते.

**शासन निर्णय :**

मुंबई शहर बेटावरील उपकरप्राप्त इमारतींच्या दुरुस्ती व पुनर्रचना कार्यक्रमासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाच्या अधिनस्त मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत वर्ग करण्याकरिता दुरुस्ती उपकराच्या रकमेपोटी देण्यासाठी सन २०२३-२४ च्या गृहनिर्माण विभागाच्या खर्चाच्या विवरणपत्रात मागणी क्र. क्यु-३, २२१६ गृहनिर्माण, ८०, सर्वसाधारण, ८००, इतर खर्च, (००) (०५) मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरिता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाला उपकराच्या वसुलीची रक्कम देणे (अनिवार्य) (२२१६ ०६२५) ३२, अंशदाने या लेखाशीर्षाखाली रु.३९,९०,००,०००/- (रुपये एकोणचाळीस कोटी नव्वद लक्ष फक्त) इतकी व मागणी क्र. क्यु-३, २२१६ गृहनिर्माण, ८०, सर्वसाधारण, ८००, इतर खर्च, (००) (०२) मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरिता शासकीय अंशदान म्हणून महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाला रक्कम देणे (अनिवार्य) (२२१६ ०५९२) ३२, अंशदाने या लेखाशीर्षाखाली रु.३९,९०,००,०००/- (रुपये एकोणचाळीस कोटी नव्वद लक्ष फक्त) इतकी अशी एकूण रू.७९,८०,००,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.

सदर अर्थसंकल्पित तरतूदीतून यापूर्वी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये उक्त दोन्ही लेखाशिर्षातून प्रत्येकी रू.२६,२७,००,०००/- अशी एकूण रू.५२,५४,००,०००/- इतकी रक्कम महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणास वितरीत करण्यात आलेली आहे. तद्नंतर आता मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ यांनी मागणी केल्यानुसार बृहन्मुंबई महानगर पालिकेद्वारे राज्याच्या एकत्रित निधीत दुरुस्ती उपकरापोटी जमा केलेल्या रू.९,५१,६२,४८१/- इतक्या रकमेइतकी रक्कम सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मागणी क्र. क्यु-३, २२१६ गृहनिर्माण, ८०, सर्वसाधारण, ८००, इतर खर्च, (००) (०५) मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरिता महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाला उपकराच्या वसुलीची रक्कम देणे (अनिवार्य) (२२१६ ०६२५) ३२, अंशदाने या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.३९,९०,००,०००/- इतक्या तरतुदीपैकी शिल्लक राहिलेल्या तरतूदीमधून रू.९,५१,६२,४८१/- इतकी (रुपये नऊ कोटी एक्कावन्न लक्ष बासष्ट हजार चारशे एक्याऐंशी फक्त) व मागणी क्र. क्यु-३, २२१६ गृहनिर्माण, ८०, सर्वसाधारण, ८००, इतर खर्च, (००) (०२) मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना निधीत जमा करण्याकरिता शासकीय अंशदान म्हणून महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाला रक्कम देणे (अनिवार्य) (२२१६ ०५९२) ३२, अंशदाने या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रु.३९,९०,००,०००/- इतक्या तरतूदीपैकी शिल्लक राहिलेल्या तरतूदीमधून रु.९,५१,६२,४८१/-(रुपये नऊ कोटी एक्कावन्न लक्ष बासष्ट हजार चारशे एक्याऐंशी फक्त) इतकी अशी एकूण रु.१९,०३,२४,९६२/- (एकोणवीस कोटी तीन लक्ष चोवीस हजार नऊशे बासष्ट फक्त) इतकी रक्कम वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांना वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण यांनी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास अधिनियम, १९७६ च्या कलम ८६ नुसार सदर रक्कम मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळास उपलब्ध करुन द्यावी.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९०/ व्यय-३, दि.२०.०३.२०२३ रोजीच्या मान्यतेने महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२८१२५५५५४९०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by DEEPAK VIJAY SHELAR
Date: 2024.03.28 13:05:52 +05'30'

**( दीपक शेलार )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
२. मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.

३. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा), मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
५. वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, महाराष्ट्र गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
६. मुख्य लेखाधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
७. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, संगणक शाखा, मुंबई.
८. अधिदान व लेखाधिकारी, नवीन प्रशासकीय भवन, वांद्रे कुर्ला संकुलन, मुंबई-५१ (२ प्रती)
९. अवर सचिव (लेखा कार्यासन) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. वित्त विभाग (व्यय-३ कार्यासन) / (अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई-३२.
११. अवर सचिव (अर्थसंकल्प-१/रोखशाखा) गृहनिर्माण, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१३. निवड नस्ती (दुवपु-२ कार्यासन) गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.